प्रशासकीय विभाग व त्यांच्या
अधिपत्याखालील असलेल्या कार्यालयातील
अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत...

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
क्रमांक : असंक-१००४/प्र.क्र. १२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ४ ऑक्टोबर, २००४.

संदर्भ : १) शासन निर्णय, क्रमांक-असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.९.२००१
२) शासन निर्णय, क्रमांक : असंक-१००४/प्र.क्र. १२/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.१९.८.२००४

**प्रस्तावना :**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १०.९.२००१ च्या शासन निर्णयातील आदेशानुसार सर्व प्रशासकीय विभाग आणि त्यांच्या नियंत्रणाखालील विभागप्रमुख यांनी त्यांच्या आस्थापनेवरील सर्व मंजूर पदांचा आढावा घेवून तत्संबंधीच्या सुधारित आकृतिबंधाच्या अहवालास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक ठरविण्यात आले आहे. तदनुसार उच्चस्तरीय सचिव समितीकडून शासकीय विभाग / कार्यालयांचा पदविषयक आढावा नियमित स्वरुपात घेण्यात येत आहे. दिनांक १७.७.२००४ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत सचिव (व्यय) यांनी समितीच्या असे निदर्शनास आणले की, सध्या शासकीय विभाग / कार्यालयांतील अस्थायी पदांना वेळोवेळी मुदतवाढ देणे आवश्यक असल्यामुळे तत्संबंधीच्या शेकडो नस्ती वित्त विभागामध्ये सहमतीसाठी प्राप्त होतात. प्रत्यक्षात अस्थायी पदे आणि स्थायी पदे यामध्ये सेवासुविधांविषयक कोणताही मुलभूत फरक सध्या राहिलेला नसल्यामुळे संबंधित प्रशासकीय विभागांनीच त्यांच्या आस्थापनांवरील व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील शासकीय विभाग व कार्यालयांच्या आस्थापनांवरील अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना आवश्यकतेनुसार मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांच्या स्तरावरच प्रदान करणे योग्य ठरेल. या सर्व बाबींची समितीच्या बैठकीत चर्चा होवून समितीने केलेल्या शिफारशीनुसार शासनाने उपरोक्त संदर्भ क्र.२ चा शासन निर्णय यापूर्वीच निर्गमित केलेला आहे. त्यानुसार ज्या शासकीय विभागांचा पदविषयक आढावा पूर्ण झालेला नाही अशा सर्व शासकीय विभाग व कार्यालयांच्या आस्थापनांवरील मंजूर पदांपैकी अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना कमाल दि.२८ फेब्रुवारी २००६ पर्यंतच्या कालावधीसाठी आवश्यकतेनुसार मुदतवाढ देण्याचे अधिकार सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना देण्यात आलेले आहेत. त्याच धर्तीवर ज्या शासकीय विभाग व कार्यालयांचा मंजूर पदांचा सर्वंकष आढावा पूर्ण होवून उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने सुधारित आकृतिबंध निश्चित करण्यात येवून तत्संबंधीचा शासन निर्णय निर्गमित झालेला आहे, अशा सर्व शासकीय विभाग व कार्यालयांच्या सुधारित आकृतिबंधातील अस्थायी पदांना

...continuation

मुदतवाढ देण्याचे अधिकार सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :**

ज्या निरनिराळया शासकीय विभाग आणि कार्यालयांच्या सर्व मंजूर पदांचा सर्वंकष आढावा पूर्ण होवून उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने संबंधीत शासकीय विभाग व कार्यालयांचा सुधारित आकृतिबंध निश्चित करण्यात येऊन तत्संबंधीचा शासन निर्णय निर्गमित झालेला आहे. अशा सर्व शासकीय विभाग व कार्यालयांच्या सुधारित आकृतिबंधातील सर्व अस्थायी पदांना आवश्यकतेनुसार पुढील मुदतवाढ देण्याचे अधिकार या शासन निर्णयानुसार सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना देण्यात येत आहेत. त्यानुसार सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व शासकीय विभाग व कार्यालयांच्या सुधारित आकृतिबंधाच्या शासन निर्णयामध्ये दर्शविण्यात आलेल्या पदांपैकी सर्व अस्थायी पदांना आवश्यकतेनुसार पुढील मुदतवाढ देण्याची आवश्यक ती सर्व कार्यवाही त्यांचे स्तरावर त्वरित पूर्ण करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**विनोद कुळकर्णी**

**शासनाचे उप सचिव.**

१. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
२. सर्व सह / उप सचिव (व्यय कार्यासने), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. उप सचिव (आस्थापना), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४. उप सचिव (विक्रीकर प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५. उप सचिव (कोषागार प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. सर्व अवर सचिव (व्यय कार्यासने), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. सर्व कक्ष अधिकारी (व्यय कार्यासने), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. कार्यासन अधिकारी (प्रशा-१), हमी , अल्पबचत व लॉटरी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. कार्यासन अधिकारी (विक्रीकर प्रशासन - १,२,३ व ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०. कार्यासन अधिकारी (कोषागार प्रशासन - १,२,३,४ व ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११. कार्यासन अधिकारी (अर्थबळ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.